**मुरुड आंबोली खारभूमी योजना ता.मुरुड जि.रायगड, या योजनेच्या नूतनीकरणाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः खाभूयो २०१५/(३१/२०१५)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि:- ११/०१/२०१७

पहावे -

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र. २०१४/ तां-२(१)/ मुरुड खाभूयो/ ५४३, दि. २२/०१/२०१५

**प्रस्तावना:-**

मुरुड आंबोली खारभूमी योजना ता.मुरुड जि.रायगड, ही खारभूमी, योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी २८८० मी. आहे. सदर योजना एकदरा खाडीच्या तीरावर आहे. नियमित भरती-ओहोटी, पूर व अतिवृष्टीमुळे योजनेच्या लाभक्षेत्रात खारे पाणी येत असल्याने शेतक-यांचे नुकसान होत असल्यामुळे ही योजना होणे गरजेचे आहे. त्याकरिता योजना तातडीने हाती घेण्याबाबत ग्राम पंचायत, लाभधारक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला मुरुड आंबोली योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुरुड आंबोली खारभूमी योजना ता.मुरुड जि.रायगड योजनेस विभागाच्या सन २०११-१२ व सा.बां.वि. दरसूची २०१२-१३ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रू. ३,२६,३७,२६१ (रुपये तीन कोटी सव्वीस लक्ष, सदतीस हजार,दोनशे एकसष्ठ फक्त) इतक्या रकमेस योजनेच्या नूतनीकरणाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रु. २,९६,७०,२३७ (रुपये दोन कोटी शह्यानव लक्ष, सत्तर हजार,दोनशे सदतीस फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रु. २९,६७,०२४ (रु.एकोनतीस लक्ष, सदुसष्ठ हजार चोवीस फक्त) उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दिनांक १७.४.२०१५ "अन्वये" प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व उप सचिव तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२४/का.१४३४, दि. ०५.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ( १५२/२०१७) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक असा २०१७०१११११६०१०१३५२७ आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2017.01.12 16:18:32 +05'30'

**सहपत्रः**- परिशिष्ट अ

**( रा. बा. क्षीरसागर )**
अवर सचिव

**प्रतिलीपी :-**

१. मा. मंत्री (खारभूमी) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
६. मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
११. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई
१३. संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२
१४. जिल्हाधिकारी, रायगड.
१५. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

जलसंपदा विभाग/खारभूमी

## परिशिष्ट-अ

**शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१५/(३१/२०१५) खारभूमी दिनांक ११/०१/२०१७ चे सहपत्र मुरुड आंबोली खारभूमी योजना ता.मुरुड जि.रायगड,या अंदाजपत्रकाचा गोषवारा.**

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण किंमत रु. |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक | ५८,९८६.०० |
| २ | बी-भूसंपादन | ०.०० |
| ३ | सी- माती काम | १,६९,९३,२८८.०० |
| ४ | एफ( आर.एच.टी. वर्क्स ) | १,२०,८९,८८२.०० |
| ५ | कें( इमारती) | १०,०००.०० |
| ६ | एम-( वृक्षारोपण) | ५,०००.०० |
| ७ | ओं-(संकीर्ण) | ५,०००.०० |
| ८ | पीं-(देखभाल) | ५,०००.०० |
| ९ | आर ( दळणवळण) | ५,०३,०८१.०० |
| | एकूण | २,९६,७०,२३७.०० |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | २९,६७,०२४.०० |
| | एकूण | **३,२६,३७,२६१.००** |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | १६७ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रु. १,९७,८०० /- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.७८ |

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2017.01.12 16:20:21 +05'30'

( रा.बा. क्षीरसागर )
अवर सचिव